# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि ४६/०७१९/प्र.क्र.१०७/ख-२,

महसूल व वन विभाग, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २५ सप्टेंबर, २०२०

विषय : गौण खनिज-अमरावती
**मौजे नमस्कारी (गोदरी), ता.तिवसा या वाळूगटाची रक्कम परत करणेबाबत.**
**अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती.**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, अमरावती यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र.खनिज/अका/कावि-११५३/ २०१९, दि.२४/०६/२०१९, क्र.खनिज/अका/कावि-१६९६/२०१९, दि.२४/०९/२०१९, क्र.खनिज/अका/ कावि-१०४/ २०२०, दि.१३/०२/२०२० रोजीच्या पत्रास तसेच विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.आकाअ/म.शा.-२/ कावि-२१५/२०२०, दि.९/०३/२०२० रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१७-१८ करीता बोर नदी प्रकल्प, ता. जि. अमरावती येथील कामाकरीता नमस्कारी (गोदरी), ता.तिवसा हा वाळूगट निर्धारित किंमत रू.७५,९४,६००/- एवढ्या किंमतीस दि.२५/०४/२०१८ रोजीच्या आदेशान्वये अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती यांना मंजूर करण्यात आला. सदर वाळूगटाचा दि.१८/०५/२०१८ रोजी ताबा देण्यात आला. परंतु, वाळूगटधारक अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती यांनी रेती घाटावरून रेती नेण्यासाठी वाहतुकीचा रस्ता शेतकऱ्यांनी पावसाळा जवळ आल्यामुळे बंद केल्याने रक्कम परत मिळणेची विनंती केली.

मंडळ अधिकारी, वरखेड यांनी पंचनामा करून रेती वाहतुकीचा रस्ता खाजगी मालकीचे शेतातून असल्याने व पावसाळा जवळ आल्यामुळे रस्ता उपलब्ध होवू शकला नसल्याकारणाने सदर रेतीघाटातील रेतीची उचल केलेली नसल्याचे कळविले. तसेच तहसिलदार, तिवसा यांनी तलाठी, नमस्कारी (गोदरी) व मंडळ अधिकारी, वरखेड यांच्या संयुक्त अहवालानुसार रेतीघाटाची पाहणी करून वाळूगटातून उत्खनन झाले नसल्याने रक्कम परत करण्यास हरकत नसल्याचे कळविले. त्याअनुषंगाने प्रस्तुत प्रकरण अपर जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या अध्यक्षतेखाली समितीच्या दि.२३/०४/२०१९ रोजीच्या बैठकीत ठेवून रक्कम परत करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत सर्वानुमते ठरले.

०२. अपर जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीने सदर वाळूगटावरून वाळू वाहतूकीसाठीचा रस्ता शेतकऱ्यांच्या मालकीच्या खाजगी शेतामधून जात असून पावसाळा जवळ आल्यामुळे शेतकऱ्यांनी बंद केल्याने वाळूगटधारकास रक्कम परत करण्याची शिफारस केली आहे. त्याअनुषंगाने वाळूगटधारक यांना त्यांनी शासनजमा केलेली रक्कम रू.७५,९४,६००/- (रुपये पंच्याहत्तर लक्ष चौऱ्याण्णव हजार सहाशे फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती यांना रक्कम रु.७५,९४,६००/- (रुपये पंच्याहत्तर लक्ष चौऱ्याण्णव हजार सहाशे फक्त) इतकी रक्कम, त्यांनी वाळूगटाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०४. याबाबीवर होणारा खर्च सन २०२०-२१ यावर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००९२५१७४८३७४६१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GAJANAN DHARMA DABHILKAR

Digitally signed by GAJANAN DHARMA DABHILKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c4f6398a3105d0cebbc1a00f25241de3304637656082108e12
27c13033d76bfe, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=69c2bd0a657d8ab9b87341301d9ac56408774af7b6416
010e1d362583c71ffd6, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=GAJANAN DHARMA DABHILKAR
Date: 2020.09.25 17:48:16 +05'30'

**( गजानन दाभिळकर )**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी अमरावती, अमरावती.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
५) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
७) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.